# पाणी पिणा-या तुंब्याचा पाठलाग करा

## भुयारी रेल्वेची गोष्ट



# पाणी पिणा-या तुंब्याचा पाठलाग करा

भुयारी रेल्वेची गोष्ट

लेखक : एफ एन मोंजो
रेखाटनं : फ्रेड ब्रेनर

मराठी अनुवाद : नीलांबरी



पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
एक म्हातारा तुम्हाला स्वतंत्र करायला उत्सुक आहे
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
जेव्हा सूर्य उगवल्यावर पहिला होला ओरडेल
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
एक म्हातारा तुमची वाट पहातोय
तुम्हाला स्वतंत्रतेच्या पथावर नेण्यासाठी
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
नदीकिनार्‍यावर तुम्हाला एक सुंदर रस्ता दिसेल

दुतर्फा वठलेली झाडं तुम्हाला रस्ता दाखवतील
डावा पाय, उजवा पाय, पायी चालत रहा
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
दोन पर्वतांमध्ये नदी लुप्त होईल
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
दुसर्‍या बाजूला अजून एक नदी असेल
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..
जेव्हा मोठी नदी, छोट्या नदीला मिळेल
पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करा..



प्रकरण १

## चर्चमध्ये मासे पकडणं..

टॉमी फुलरनं आपला उजवा हात खिशात घातला.

खिशात सफरचंद होतं.

मग त्यानं आपला डावा हात दुसर्‍या खिशात घातला.

मासे धरण्याचा गळ त्या खिशात होता.
“गप्प बस..” त्याचा भाऊ सॅम कुजबुजला.

“सरळ बस..” त्याचा भाऊ अँडी कुजबुजला.

दुपारची वेळ होती. ही तिन्ही मुलं चर्चमध्ये होती.

ते दिवसभर तिथेच थांबले.

आई, वडील, डॅडली आजी इतर मोठ्या माणसांबरोबर खालच्या मजल्यावर होते.





सगळी लहान मुलं वरच्या गॅलरीत होती.
मुली एका बाजूला होत्या.
मुलं दुसर्‍या बाजूला होती.

दुसर्‍या बाजूला टॉमीनं आपल्या बहिणी
– हेलन, कॅट आणि रॅचेल यांच्याकडे पाहिलं.
टॉमीनं सफरचंदाचा एक टवका तोडला.
मग त्यानं दातानं अजून तीन टवके तोडले.





खिडकीच्या बाहेर तो
हिरव्यागार गवतावर बागडणारा बदकांचा
थवा पहात होता.
फादर रेव्हरंड मॉर्स म्हणाले, आपण आता
२३८१ नंबरचा श्लोक म्हणू

मग प्रत्येकजण उठून उभा राहिला.
त्यांनी गायला सुरुवात केली
, *हे ईश्वरा, गतायुष्यात तू आम्हाला मदत केली आहेस.*
*येणाऱ्या वर्षांमध्येही आम्हाला तुझ्याकडून तीच आशा आहे.*
टॉमीनं मासे पकडणारा दोर हातात घेतला. सफरचंदाला
मध्यभागी एका खाचेत दोर बांधला.
"हे बरोबर नाही.." अँडी म्हणाला
टॉमीनं चर्चची एक खिडकी उघडून सफरचंदाचा मधला भाग
बाहेर फेकला.

तीन बदकं तो सफरचंदाचा तुकडा पहायला आली.
एक बदकानं त्या तुकड्याला तोंड लावलं.
“ये बदका..” टॉमी म्हणाला.
दुसऱ्या बदकाचं आपल्या मोठ्या चोचीनं सफरचंदाचा मोठा टवका तोडला.



टॉमीनं मासेमारीच्या दोरीवर हात फिरवला.

बदक हवेत उडालं.

“अरे, आलं माझ्या पकडीत..” टॉमी हळूच म्हणाला..

बदकानं फंख फ़डफडवले आणि परत फडफडवले.

टॉमी आता त्याला सोडणार नव्हता..

बाकीची बदकं पण ओरडत पंख जोरजोरात फडफडवायला लागली..

त्यांच्या कर्कश्श आवाजानं चर्चमधले सगळ्यांचं लक्ष तिकडे वेधलं.. सगळ्यांनी गाणं बंद केलं..

रेव्हरंड मॉर्स यांनी गॅलरीकडे पाहिलं..

“डेकॉन फुलर..” रेव्हरंड मॉर्स म्हणाले.

“परत एकदा हा थॉमसचाच अवखळपणा आहे अशी मला भीती वाटतीय”

त्याचे वडील पटकन गॅलरीजवळ गेले.

“थॉमस डडली फुलर. तो आवळलेला दोर जरा सैल कर..”

टॉमीनं दोरा सोडून दिला. मग बदक जमिनीवर कोसळलं.



वडिलांनी टॉमीला चर्चबाहेर हाकललं
“तू सरळ घरी जा बरं..” वडील त्याला रागावले.
“आणि निमूटपणे तुझ्या खोलीत जा..”
मग ते परत चर्चमध्ये गेले आणि त्यांनी दरवाजा नीट बंद केला.







प्रकरण २

# पळपुटे

टॉमी घराच्या दिशेनं चालायला लागला. त्याला सतत आपल्याला मिळणारा मार दिसत होता.
तो घरी पोचला तोपर्यंत काळोख दाटला होता.
टॉमीला आकाशात संध्याकाळचं नक्षत्र दिसत होतं.
मग तो घोड्यांना हॅलो म्हणायला तबेल्यात गेला.
वडिलांनी त्यांच नावं डॅन वेबर आणि हेन्री क्ले अशी ठेवली होती.

टॉमीनं त्यांना एक एक सफरचंद दिलं.
“तुम्हाला चर्चमध्ये वगैरे जावं लागत नाही ना? का बरं?” टॉमीनं विचारलं.
घोड्यांनी आपले खूर आपटले आणि सफरचंद हुंगलं. टॉमीला घोडागाडीत (वॅगनमध्ये) चारा भरलेला दिसला.
त्याला वॅगनमधल्या चार्ऱ्याच्या ढिगावर उडी मारायची होती.





त्यासाठी तो तबेल्यातल्या चार्‍याच्या ढिगावर चढला.
“हॅलो, डॅन वेबर.. हाय हेन्री क्ले.. बघा बरं मी काय करतोय..” तो जोरात ओरडला.
मग तो वॅगनमध्ये रचलेल्या चार्‍याच्या ढिगावर शिडीनं उतरला. तिथले दोन कोंबडे त्याला पाहून ओरडले.
तेवढ्यात तबेल्यातल्या चार्‍याच्या ढिगातून कोणाचातरी आवाज आला.
“आ आ आहा..” तो लहान मुलाच्या रडण्याचा आवाज होता.
“कोण आहे तिथे?” टॉमीनं विचारलं.

डॅन वेबरनं आपलं खूर जमिनीवर आपटलं.
तो आवाज कोणाचा आहे हे पहायला टॉमी परत एकदा चार्‍याच्या ढिगावर चढला
“कोण आहे?” टॉमीनं जोरात विचारलं.
“तिथेच थांब..” एक गंभीर आवाज ऐकू आला.
“तू आम्हाला जिवंतपणी पकडू शकणार नाहीस.” एक काळा माणूस उभं राहून म्हणाला.
त्याच्या अंगाला सगळीकडे चारा लागला होता. त्याच्या हातात एक कुर्‍हाड होती.



टॉमी घाबरुन चार्‍याच्या ढिगात
पडलाच.
“ओह, विन्नी..” तो माणूस म्हणाला.
हा तर फक्त
एक लहान मुलगा आहे.

त्या माणसानं कुर्‍हाड़ खाली ठेवून दिली.
“आम्ही इथे फक्त लपायला आलो आहोत”. तो
स्मितहास्य करुन म्हणाला.
“आम्ही तुला इजा करणार नाही”
“तुम्ही इथे आहात हे बाबांना माहिती आहे का?”
टॉमीनं विचारलं.
“तुम्ही आमच्या शेतात काय करताय?”





"डेकन फुलर तुझे वडिल का?"
टॉमीनं मान डोलावली.
"त्यांनीच आम्हाला इथे लपायला सांगितलं आहे."
त्याच्या शेजारी एक लहान मुलगा उभा होता.
"तो माझा मुलगा – लिटिल जेफ." तो माणूस म्हणाला. "मी बिग जेफ आहे."

"ही माझी बायको विन्नी आणि ही मुलगी बेबी पर्ल. आम्ही पळून चाललो आहोत."
"पळून चालले आहात?" टॉमीनं विचारलं.
"आम्ही कॅनडाला चाललोय." विन्नी म्हणाली.
"आम्ही कॅरोलिनावरुन आलोय". जेफ म्हणाला.

.

“आम्ही पाणी पिणार्‍या तुंब्याचा पाठलाग करत इथे पोचलो आहोत.”

”पाणी पिणारा तुंबा?” टॉमीनं विचारलं.

”हा काय प्रकार आहे?”

”बापरे..” लिटिल जेफ म्हणाला.

”म्हणजे तू पाणी पिणार्‍या तुंब्याबद्दल कधीच ऐकलं नाहीस का? चल, मी दाखवतो तुला.”

लिटिल जेफ मचाणावरुन उतरला आणि शेताकडे असलेल्या दरवाजाकडे पळाला.

वरती काळ्याभोर आकाशात तारकापुंज चमकत होते.

लिटिल जेफनं सप्तर्षिंकडे (बिग डिपर) कडे इशारा केला.

“हा आहे पाणी पिणारा तुंबा.”

“नाही, तो तर सप्तर्षी (बिग डिपर) आहे.” टॉमी म्हणाला.

“तेच ते..” लिटिल जेफ म्हणाला.

“पाणी पिणार्‍या तुंब्यासमोरचे बिंदू थेट ध्रुव तार्‍याकडे (पोल स्टार) इशारा करतात.

ध्रुवतार्‍याच्या रेषेत प्रवास करुन आम्ही कॅनडाला पोचू.”

”कॅनडाला पोचून आम्ही गुलामगिरीतून मुक्त होऊ.”





“थॉमस डडली फुलर..” वडिलांनी मागच्या

बाजूनं येऊन विचारलं.. “मी तुला तुझ्या खोलीत थांबायला सांगितलं होतं ना..”

”बाबा,” टॉमी आश्चर्यचकित होऊन म्हणाला..

“मला जेफ आणि विन्नी यांचा पत्ता लागला आणि.....”

”मला माहिती आहे तुला अजून काय सापडलं.”
“तुला माझ्या सगळ्याच प्रवाशांचा पत्ता लागला.” वडिल म्हणाले.
“आता एकही प्रश्न विचारु नकोस.”
“घोडागाडी जोडायला मदत कर.”
“आपल्याला पुढचा प्रवास सुरु करायचा आहे.”



प्रकरण ३

# भुयारी रेल्वे

टॉमी आणि वडील वॅगनमध्ये बसले. जेफ, विन्नी, लिटिल जेफ आणि बेबी पर्ल चार्‍याच्या ढिगार्‍यात लपून बसले होते.
ते नदीच्या दिशेने गेले.
“मी आयुष्यभर गुलामगिरीत राहिलोय, टॉमी.” जेफ म्हणाला.
“दोन आठवड्यांपूर्वीपर्यंत मी गुलाम होतो.”



" “भुयारी रेल्वे?” टॉमीनं विचारलं.

“तुला त्याबद्दल काहीच माहिती दिसत नाही.”

लिटिल जेफ म्हणाला.

“तू त्याबद्दल कधीच ऐकलं नाहीस का?”



"हे बघ टॉमी." वडिल म्हणाले.

"भुयारी रेल्वे ही धुराचं इंजिन आणि रूळ अशी डबे असलेली खरी रेल्वे नाही."

"गुलामगिरी ही चुकीची प्रथा आहे असं मानणार्‍या लोकांचा तो एक गुप्त समूह आहे."

"ती माणसं आपल्यासारख्यांच्या घरात किंवा शेतात काही दिवस लपून रहातात. त्यांचं जाळं कॅनडापर्यंत पसरलेलं आहे."

"समूहातला प्रत्येक सदस्य जेफ आणि विन्नीसारख्या लोकांना लपायला जागा देतो. त्यांना पळून जायला मदत करतो."
"आणि जमिनीखालच्या या रेल्वेरोडवर कितीतरी स्टेशन्स पण आहेत." लिटिल जेफ म्हणाला.
"आपल्या शेतासारखी.." टॉमी म्हणाला.

.

“आणि भुयारी रेल्वेमार्गात कंडक्टर पण आहे.” जेफ म्हणाला.

“माझ्यासारखा..” वडिल म्हणाले.

“आणि त्यांना खरे प्रवासी पण भेटतात..” विन्नी म्हणाली.

”आमच्यासारखे..” लिटिल जेफ म्हणाला.

”ते याला जमिनीखालचे म्हणजे अंडरग्राऊंड म्हणतात..” वडिल म्हणाले .. “कारण त्यांना हे गुप्त ठेवायचं आहे.”

“यात यश मिळवायचं असेल तर प्रत्येक गोष्ट गुप्त रहायला हवी.”

”हे बरोबर आहे”. जेफ म्हणाला. ”आम्ही गुलाम मूल्यवान आहोत. आम्ही पळून गेल्यामुळे आमच्या जुन्या मालकाचं २५००० डॉलर्सचं नुकसान झालं आहे.”

”तो आम्हाला पकडायला माणसं पाठवेल याची मला पूर्ण खात्री आहे.”

”तुम्ही आता चार्◌्याच्या ढिगाखाली जाऊन लपा..”

”जोपर्यंत माझ्याकडे माझी कुर्◌्हाड आहे,
तोपर्यंत मला कोणी पकडू शकणार नाही.” जेफ म्हणाला.

त्यानंतर जेफ, विन्नी, लिटिल जेफ आणि बेबी पर्ल सगळेच लपून बसले.

# इनाम

# REWARD

आपल्या मेनार्ड रीव्ह्ज बाँड या मालकापासून पळालेला, ॲडजस्टो नदी, डॉर्चेस्टर काऊंटी, दक्षिण कॅरोलिनाच्या लार्कसपूर प्लांटेशनमधला. ३० वर्षांचा जेफ नावाचा एक काळा माणूस. उंची ६ फूट २ इंच. वुलनचा तपकिरी कोट आणि डेनिमची पँट घातलेला. १५ ऑक्टोबर १८५१ रोजी तो शेवटचा दिसला होता. पळून जाताना त्याची बायको लॅव्हिनिया – वय वर्ष २८ आणि दोन मुलं जेफ, ९ आणि पर्ल हे देखील त्याच्या सोबत होते. जो कोणी या पळून गेलेल्या गुलामांना पकडून मालकाकडे आणेल त्याला २५० डॉलर्सचं इनाम दिलं जाईल. सगळ्या बोटी, जहाजं आणि इतर लोकांना आम्ही सावधानतेचा इशारा देत आहोत. जर कोणी या गुलामांना लपायला मदत केली तर त्यांना कायद्यानं पेनॉल्टी पडेल आणि शिक्षाही होईल.

चार्ल्सटन एस सी. २ ऑक्टोबर १८५१



“टॉमी..” वडिल म्हणाले. “आज रात्री जे काही घडलं त्याबद्दल कोणापाशी अवाक्षरही काढू नकोस.”

“जेफ हा एक साहसी माणूस आहे. एका साहसी माणसानं परत गुलाम व्हावं असं

मला वाटत नाही. तू वचन दे..”

”मी वचन देतो.” टॉमी म्हणाला.

वडील म्हणाले, ”हा आपल्या प्रवासाचा शेवटचा टप्पा आहे.”
”आता मला एक नाव शोधायची आहे.”
”ती नाव या नदीतटापाशीच लपलेली असेल”.
वडील अंधारात नाहीसे झाले.
तेवढ्यात कोणत्यातरी प्राण्याचा आवाज आला.





प्रकरण ४

# शोध घेणारा समूह

टॉमीनं रस्त्यावर खुरांचा आवाज ऐकला.
त्याला कंदील हलताना दिसले.
घोड्यांवर चार माणसं होती.
त्यांनी वॅगन थांबवली.
ते आपल्या घोड्यांवरुन खाली उतरले.
"हे बघ बालमित्रा.." त्यांचा म्होरक्या म्हणाला.
"मी अमेरिकन मार्शल आहे. ही सगळी माझी माणसं आहेत.
आम्ही त्या वॅगनच्या शोधात आहोत.
आम्ही पळून गेलेल्या गुलामांना शोधतो आहोत."
"पळून गेलेले?" टॉमी म्हणाला.
"एक निग्रो गुलाम.. मार्शल म्हणाला. त्याची बायको आणि दोन मुलं."







”त्यांना पकडून देणार्‍याला इनाम मिळणार आहे.”
”तुम्ही त्यांना या वॅगनमध्ये तर लपवलेलं नाही ना.. ”
टॉमीच्या घशाला कोरड पडली.

तो म्हणाला, “या वॅगनमध्ये चार्‍याशिवाय काही सापडणार नाही.”
“पाहू”, “आम्ही शोध तर घेऊच.” मार्शल म्हणाला.



“जर मार्शलला ते सापडले, तर तात्काळ
त्यांना दक्षिणेत पाठवलं जाईल.”
“मग ते आयुष्यभर गुलामच रहातील.
कधीच स्वतंत्र होणार नाहीत.”

टॉमी घाबरला होता.
त्याच्या मनात ढिगार्‍यात लपलेल्या
लिटिल जेफ आणि त्याच्या कुटुंबियांचा
विचार आला.





सगळेजण हसले.
"बाबा माझ्यावर खूप रागावले." टॉमी म्हणाला.
"ते मला बेदम चोप देणार होते. म्हणून मी घरातून पळून चाललो आहे."
"आपण चुकीच्या वॅगनचा पाठलाग करत आहोत". मार्शल म्हणाला.

"मार्शल," टॉमी म्हणाला. "मला वाटतं मी तुम्हाला खरं काय ते सांगून टाकावं. मी टॉमी फुलर आहे, आणि मीच माझ्या घरातून पळून चाललो आहे."
"तू डेकन फुलरचा मुलगा आहेस?" मार्शलनं विचारलं.
"हो. हेच सत्य आहे."
"आमच्याकडून चूक झाली." मार्शल म्हणाला. "हा तोच आहे ज्यानं आज दुपारी चर्चमध्ये बदकाला पकडून खूप दंगा केला."





"तू घरी जा आणि वडिलांचा मार खा.. तेच बरं पडेल".
"होय सर.." टॉमी म्हणाला.
"आणि पुढच्या वेळी मासेमारीला जाशील .."
मार्शल म्हणाला.. "तेव्हा आपल्या वडिलांना सांगून जा."

"पुढच्या वेळी शिकार करशील तेव्हा मला दोन बदकं आणि एक जाडजूड टर्की दे.
ही माझी आज्ञा आहे."
मग सगळे जण हसले आणि तिथून निघून गेले..



प्रकरण ५

# नदीच्या तीरावर

थोड्या वेळानंतर वडील अंधारातून बाहेर आले. जेफ आभि विन्नी ढिगार्ऱ्यात बसले होते. जेफची कुर्ऱ्हाड त्याच्या हातात होती.
"टॉमी, तू अगदी बरोबर वागलास." वडील म्हणाले.
"मला वाटलं या वेळेस मार्शल आपल्याला नक्की पकडणार". जेफ म्हणाला.
टॉमीला बोलायचीच भीती वाटत होती.

छोट्या जेफनं नावेत उडी मारली. जेफनंही उडी मारली. त्यांनी विन्नी आणि बेबी पर्लला नावेत यायला मदत केली. तेवढ्यात एका पक्ष्याचा आवाज आला.



"वॅगन तू एकट्यानंच घरी घेऊन जा, टॉमी". वडील म्हणाले.
"आम्हाला पुढच्या स्टेशनपर्यंत नावेतून जायचं आहे."



वडील उभ्यानं नाव वल्हवायला लागले.
टॉमीला पाण्याचा चुबुक चुबुक असा आवाज
ऐकू येत होता.

"गुड बाय.. लिटिल जेफ". टॉमी
कुजबुजला.

”बाय बाय.. ” लिटिल जेफ कुजबुजला.
“गुड बाय..” जेफ आणि विन्नीही म्हणाले.

वडील अंधारात नाव वल्हवत गेले आणि नाव दृष्टीपलीकडे नाहीशी झाली.





प्रकरण ६

# कायदा तोडणारे..

टॉमीला घरी पोचायला चिक्कार उशीर झाला.
आई सोडून बाकी सगळे झोपी गेले
आईनं टॉमीला जेवायला दिलं..
“बाबा ठीक आहेत ना?” आईनं विचारलं.
टॉमीनं आईला सगळी कथा ऐकवली.
मग टॉमी आपल्या अंथरुणात झोपायला गेला.



पण, त्याला झोप लागली नाही. तो आपल्या वडिलांची वाट पहात होता.
त्याला घराचा पुढचा दरवाजा बंद झाल्याचा आवाज ऐकू आला. मग त्याचे वडील त्याच्या खोलीत गेले.



”टॉमी” वडील म्हणाले.. “मला कायदे पाळायला आवडतं.”
“पण आजच्या रात्री  तू आणि मी - आपण कायदा तोडला आहे.”
”आपण जेफ आणि विन्नीला मदत करुन कायद्यानुसार चूक केली आहे.”

”मला माहिती आहे बाबा..” टॉमी म्हणाला.
”पण आपण कायदा बदलू शकत नाही का?”
”मी प्रयत्न करतो आहे.” वडिल म्हणाले.
”आम्ही खूप वर्षांपासून प्रयत्न करतोय आणि एक दिवस हा कायदा बदलेल.”





”पण आत्ता कायद्यानुसार जेफ आणि विन्नी ही कोणत्यातरी इतर व्यक्तीची मालमत्ता आहे – अगदी घोडे किंवा गायी असतात तशी.. त्यांची किंमत २५००० अमेरिकन डॉलर्स आहे. ”
”पण जेफ आणि विन्नी ही तर माणसं आहेत.” टॉमी म्हणाला.

”हो..” वडील म्हणाले.
”याच कारणामुळे मी तो चुकीचा कायदा पाळू शकत नाही.”
”याच कारणानं मला त्या कायद्याला विरोध आहे.”
”तो चुकीचा कायदा आहे.”
मग त्यांनी आपल्या मुलाला प्रेमानं जवळ घेतलं आणि दरवाजा बंद करुन घेतला.



टॉमी अंथरुणावर पडला होता पण त्याच्या मनात लिटिल जेफ आणि तशा लोकांचेच विचार होते.
"जर ते कॅनडाला पोचले.". तो कुजुबजला.."तर ते स्वतंत्र होऊ शकतील."
आपल्या खिडकीतून त्याला तेजस्वी ध्रुव तारा दिसत होता.
आता त्याला त्या काळोख्या आकाशात
"पाणी पिणारा तुंबा" दिसायला लागला होता.

## लेखकाची नोट

ही कथा खरी असू शकते.

सिव्हिल वॉरच्या आधीच्या वर्षांमध्ये हजारो गुलाम – कदाचित ७५००० गुलाम पळून जाऊन स्वतंत्र होऊ शकले. प्रवासाच्या दरम्यान ते अंडरग्राऊंड रेल्वेतून कॅनडाची हद्द पार करायचे. जिथे त्यांना अमेरिकन मार्शल पकडून परत गुलाम व्हायला भाग पाडू शकत नव्हते.

पळून जाणार‍्या काही गुलामांनी आपल्या स्वातंत्र्यासाठी द ड्रिंकिंग गॉर्ड – पाणी पिणारा तुंबा या गाण्याच्या आधारानं मार्गक्रमण केलं.

मेरीलँड आणि ओहायो या स्वतंत्र राज्यांमध्ये गुलामगिरी हा कायद्यानं गुन्हा होता. तिथे रहाणार‍्या कित्येक अमेरिकन लोकांना गुलामगिरीची चीड होती. त्यातले काही जण गुलामगिरीच्या प्रथेविरुध्द असणार‍्या संघटनांमध्ये सामील झाले. त्या लोकांना अबॉलिशनिस्ट म्हणलं जात होतं.

१८५० साली काँग्रेसनं पळून जाणार‍्या गुलामांविरुध्द फ्युजिटिव्ह स्लेव्ह लॉ पास केला. त्यानुसार सर्व नागरिकांनी पळून जाणार‍्या गुलामांना पकडायला मार्शल्सना मदत करणं अनिवार्य होतं. याचं उत्तर म्हणून अनेकजणांनी कायद्याचं पालन करायला नकार दिला. जसा डीकॉन फुलरनं या कथेत नकार दिला. नंतर १८६३ आणि १८६५ या काळातल्या यादवी युध्दात गुलामगिरीची प्रथा देशभरात बंद झाली.

**समाप्त**